तात्काळ / अर्थसंकल्प प्राथम्य सन २०१८-१९ मधील निधी वितरण.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
**दिनांक : २५ जानेवारी, २०१९.**

**पहा :-** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. ०२ एप्रिल, २०१८.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. पूरक-२०१८/प्र.क्र.९५/अर्थ-३, दि. २७ जुलै, २०१८
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. पूरक-२०१८/प्र.क्र.१३५/अर्थ-३, दि. ०५ डिसेंबर, २०१८.

## परिपत्रक

शासन परिपत्रक, वित्त विभाग, दि. ०२ एप्रिल, २०१८ नुसार सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता खालील नमूद प्रयोजने वगळता, अनिवार्य व कार्यक्रम खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या (पुरवणी मागण्यांसह) ७०% च्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरीत करण्यास सहमती देण्यात आली आहे:-

अ) आमदार स्थानिक विकास कार्यक्रम निधीच्या तरतूदी १०० टक्के.
ब) शेतकऱ्यांसंदर्भातील मनरेगा, पिक विमा, कर्ज माफी व मदत व पुनर्वसन बाबतच्या तरतूदी १०० टक्के.
क) केंद्र पुरस्कृत कार्यक्रम व त्यानुरुप राज्य हिस्सा १०० टक्के. (केंद्रीय निधी प्राप्त होण्याच्या अटीच्या अधीन)

२. सन २०१८-१९ चा उर्वरीत कालावधी, वितरीत निधी व त्याचा झालेला विनियोग पाहता, वरील प्रयोजनाव्यतिरिक्त आता खालील प्रमाणे निधी वितरणाची मर्यादा निश्चित करण्यात येत असून त्याप्रमाणे निधी अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरीत करण्यास सहमती देण्यात येत आहे:-

१) जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण / अनु. जाती / अनु. जमाती घटक कार्यक्रम) १०० टक्के.
२) अर्थसंकल्पीत निधीच्या खर्चाची मर्यादा महसूली लेख्यातील अनिवार्य खर्चाच्या बाबीवर ९० टक्के व कार्यक्रमाच्या खर्चाच्या बाबीवर ८० टक्के तसेच भांडवल लेख्यातील अनिवार्य खर्चाच्या बाबीवर ९० टक्के व कार्यक्रमाच्या खर्चाच्या बाबीवर १०० टक्के एवढी विहित करण्यात येत आहे.
३) या व्यतिरिक्त या आर्थिक वर्षाच्या उर्वरित कालावधीसाठी ०१ वेतन, ०२ मजूरी, ०४ निवृत्तीवेतन विषयक खर्च, ०६ दूरध्वनी, वीज व पाणी शुल्क, १४ भाडेपट्टी व कर, १९ आहार खर्च, २२ शस्त्रे व दारुगोळा, २४ पेट्रोल, तेल व वंगण, ३४ शिष्यवृत्ती व विद्यावेतन, ३६ सहायक अनुदाने (वेतने), ४५ व्याज प्रदाने, ५५ कर्जे व आगाऊ रकमा व ५६ कर्जाची परतफेड यासाठीच्या अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत तरतूदीचा उर्वरीत संपूर्ण निधी पूर्वीच्या पध्दतीने एकत्रितरित्या वितरीत करण्यात येत आहे. म्हणजेच यासाठी आता १००% तरतूद उपलब्ध राहील.

मात्र, जुलै, २०१८ व नोव्हेंबर, २०१८ च्या पुरक मागण्यांतील वरील अनुक्रमांक ३ मधील बाबी वगळून इतर बाबीवरील निधी वितरीत करण्यापूर्वी दि.०२ एप्रिल, २०१८ च्या परिपत्रकातील सूचना लक्षात घेऊन वितरीत करण्यात याव्यात. तसेच ज्या पुरवण्या मागण्या विनिर्दिष्टपणे काही अटी व शर्तीच्या अधीन मान्य केल्या असतील अशा पुरवण्या मागण्यांचा निधी वितरीत करण्यापूर्वी त्यास आवश्यकतेनुसार नियोजन विभाग / सामाजिक न्याय विभाग / आदिवासी विकास विभाग तसेच वित्त विभागाची मान्यता घेण्यात यावी.

३. अर्थसंकल्पीय तरतूदीत होणारी बचत महाराष्ट्र राजकोषिय उत्तरदायित्व व अर्थसंकल्पीय व्यवस्थापन नियमांतर्गत निर्धारीत केलेली वार्षिक लक्षे साध्य करण्यासंदर्भात उपयुक्त ठरणार असल्याने अर्थसंकल्पीत तरतूदींचे पुनर्विनियोजन करण्याच्या प्रशासकीय विभागांच्या अधिकारांना स्थगिती देण्यात येत असून प्रशासकीय विभागांनी पुनर्विनियोजनासंदर्भात अनिवार्य खर्चासाठी वित्त विभागाची व कार्यक्रम

खर्चासाठी आवश्यकतेनुसार नियोजन / सामाजिक न्याय / आदिवासी विकास विभाग व वित्त विभागाची मान्यता घेतल्याशिवाय निधीचे पुनर्विनियोजन करु नये. तसेच यापूर्वी निधी आहरित करुन बँक / स्वीय प्रपंजी खात्यात ठेवला असल्यास असा खर्च न होणारा निधी शासन खाती जमा करण्यात यावा.

४. प्रशासकीय विभागांना उपरोक्त मर्यादेमध्ये उपलब्ध करुन दिलेला निधी त्यांच्या अधिनस्त असलेल्या क्षेत्रीय कार्यालयांना वा प्रशासकीय विभागांना वितरीत करताना सदर निधी दि. ३१ मार्च, २०१९ पर्यंत निश्चितपणे खर्च होईल याची खात्री करावी. **सदर निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च न होता त्यांच्या अधिनस्त क्षेत्रिय अधिकारी / मंडळे / महामंडळे यांच्या बॅक खात्यात, स्वीय प्रपंजी खात्यात अथवा शासकीय लेख्याबाहेर ठेवता येणार नाही.**

५. वरील प्रमाणे प्रशासकीय विभागाने निधीचे वितरण करतांना तसेच तो खर्च करतांना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकारी नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने यापूर्वी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व प्रचलित निकष, वित्तीय अधिकारांचे प्रत्यायोजन तसेच वित्त विभागाच्या दि. ०२ एप्रिल, २०१८, दि. २७ जुलै, २०१८ व दि. ५ डिसेंबर, २०१८ च्या परिपत्रकातील अटी व शर्तींचे व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

६. या व्यतिरिक्त, या आर्थिक वर्षाच्या अखेरीस खरेदी करावयाच्या प्रस्तावासंदर्भातील कार्यवाहीबाबत वित्त विभागाकडून वेळोवेळी देण्यात आलेल्या व येणाऱ्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

७. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१९०१२५१४३६४०५२०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vasant K. Patil

Digitally signed by Vasant K. Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=56462e610dbf070fe5eefa98886b167556f80b373181ed680e4c9c879d7e3617,
serialNumber=14caf70544d4d2fb25d1da6ed673b0488e940d807179c09470fcdd9192ba4ce7,
cn=Vasant K. Patil
Date: 2019.01.25 16:37:12 +05'30'

(व. कृ. पाटील)
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव.
२) मा मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
३) मा. विरोधी पक्षनेता, (विधानपरिषद / विधानसभा), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
४) सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
५) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
७) सह सचिव / उप सचिव (अर्थसंकल्प शाखा), सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली-११०००१.
९) प्रधान महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
१०) प्रधान महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
११) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१५) सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) निवड नस्ती, अर्थसंकल्प-३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.